"One Stop Centre" या योजनेबाबत मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१६१/का-२,**
नवीन प्रशासकीय इमारत, ३रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ४ नोव्हेंबर,२०१९.

संदर्भ :-१. शासन निर्णय,महिला व बालविकास विभाग,क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.९५/का-२, दिनांक १ फेब्रुवारी, २०१६.
२. शासन निर्णय,महिला व बाल विकास विभाग,क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२२२/का-२, दिनांक २३ मार्च २०१८.
३. केंद्र शासन, महिला व बाल विकास मंत्रालयाच्या "One Stop Centre" योजनेबाबत डिसेंबर,२०१७ च्या मार्गदर्शक सूचना.
४.आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे यांचे अशापक्र/मबाविआ /४७८८, दिनांक २६.०९.२०१९ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

संकटग्रस्त महिलांना तातडीने मदत मिळण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास मंत्रालयाकडून " One Stop Centre " ही योजना कार्यान्वित करण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील प्रत्येक जिल्हयात एक " One Stop Centre " सुरू करण्यात आले आहे. या One Stop Centre मध्ये कौटुंबिक हिंसाचार पीडित, लैंगिक शोषणाच्या पीडित, मानवी वाहतुकीस बळी पडलेल्या, ॲसिड हल्ल्यातील पीडित महिलेस वैद्यकीय सुविधा, पोलीस मदतकेंद्र, समुपदेशन केंद्र व कायदेशीर मदत इत्यादी सेवा उपलब्ध करून देण्यात येत आहेत. " One Stop Centre " योजना यशस्वीपणे राबविणेसाठी केंद्र शासनाने डिसेंबर २०१७ मध्ये मार्गदर्शक सूचना(Guidelines) तयार केलेल्या असून त्यानुसार राज्यातील केंद्रांचे कामकाज सुरु आहे.

वन स्टॉप सेंटर योजनेबाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेमध्ये वन स्टॉप सेंटरच्या दैनंदीन कामकाजासाठी ईम्प्लीमेंटींग एजन्सी व दैनंदिन कामकाज चालविणेसाठी मानधनी तत्वावर कर्मचारी नियुक्ती करणेबाबत तरतूद आहे.तथापि, वन स्टॉप सेंटरच्या कामकाजासाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित कर्णेबाबत आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी संदर्भाधीन क्र.४ अन्वये शासनास प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने वन स्टॉप सेंटर योजनेची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी ईम्प्लीमेंटींग एजन्सी (IA) कर्मचारी नियुक्तीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत व्यवस्थापन समिती/कृती दलासाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित कर्ण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

वरील पार्श्वभूमीवर वन स्टॉप सेंटर योजनेबाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने वन स्टॉप सेंटरच्या दैनंदीन कामकाजासाठी ईम्प्लीमेंटींग एजन्सी व दैनंदिन कामकाज चालविणेसाठी मानधनी तत्वावर कर्मचारी नियुक्ती करणेबाबत खालीप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत -

**वन स्टॉप सेंटर योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना-**

१. केंद्र शासनाच्या डिसेंबर २०१७ च्या मार्गदर्शक सूचनेमधील ANNEXURE VII मध्ये सदर योजनेसाठी नेमावयाच्या कर्मचा-यांचे पद, शैक्षणिक पात्रता व अनुभव याबाबत सविस्तर तरतूद दिली आहे. त्यानुसार व्यवस्थापन समितीने/कृती दलाने ईम्प्लीमेंटींग एजन्सीव्दारे (IA) नेमण्यात येणा-या कर्मचा-यांची शैक्षणिक पात्रता व अनुभव याबाबत खात्री करावी.

२. ईम्प्लीमेंटींग एजन्सीव्दारे (IA) नेमण्यात आलेल्या कर्मचा-यांची शैक्षणिक पात्रता व अनुभव हा मार्गदर्शक सूचनांमध्ये विहीत केल्यानुसार असल्याची व्यवस्थापन समितीची खात्री झाल्यानंतरच सदरील ईम्प्लीमेंटींग एजन्सीला व्यवस्थापन समितीने कर्मचारी नेमण्यास सहमती दयावी.

३. ईम्प्लीमेंटींग एजन्सीने (IA) नियुक्त करावयाच्या प्रस्तावित कर्मचा-यांची यादी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठित समितीस सादर करणे बंधनकारक राहील.यामध्ये कर्मचा-यांची शैक्षणिक पात्रता, अनुभव, ईम्प्लीमेंटींग एजन्सीच्या संचालक मंडळाशी कोणतेही हितसंबंध नसल्याची खात्री करणे, कोणताही गुन्हा दाखल नसणे इ.बाबींची खातरजमा करण्यात यावी.तदनंतर ईम्प्लीमेंटींग एजन्सी व प्रस्तावित कर्मचा-यांमध्ये केला जाणा-या कराराची/अनुबंधाची (Contract) तपासणी करावी.

४. व्यवस्थापन समितीची मान्यता प्राप्त झाल्यावर ईम्प्लीमेंटींग एजन्सी व कर्मचा-यांमध्ये करार/अनुबंध होईल याची खात्री जिल्हा महिला व बालविकास अधिकारी यांनी करावी.

५. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना व राज्य शासनाने विहित केलेल्या पदनिहाय दरानुसार दरमहा मानधन देणे, TDS व इतर करांचे (Tax) व्यवस्थापन करणे याबाबतची कार्यवाही जिल्हा महिला व बालविकास अधिकारी यांचे व्दारा सुनिश्चीत केली जाईल व त्याबाबत व्यवस्थापन समितीस वेळोवेळी अवगत करण्यात येईल.

६. ईम्प्लीमेंटींग एजन्सीच्या कामकाजाचा दर तीन महिन्यांनी जिल्हाधिकारी यांचे मार्फत आढावा घेऊन एजन्सीचे कामकाज समाधानकारक असल्याची खात्री करण्यात यावी. तसेच जिल्हा महिला व बालविकास अधिकारी यांचेमार्फत दरमहा एजन्सीच्या कामकाजाचा/कार्यपध्दतीचा आढावा घेण्यात यावा व त्याबाबत विहित नमुन्यात प्रस्ताव सादर केल्यानंतर जिल्हाधिकारी यांची संमती प्राप्त झाल्यानंतर मानधन अदा कऱण्याची कार्यवाही कऱण्यात यावी.

७. वन स्टॉप सेंटर मध्ये येणा-या महिलांकडे जर काही रोख रक्कम,मौल्यवान वस्तू व दागदागिने असतील तर अशा महिलांसाठी लॉकर्स (Lockers) उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधीत एजन्सीची राहील. अशा सर्व वस्तूंची जिल्हा महिला व बालविकास अधिकारी यांचे आदेशाने नोंद ठेवण्यात यावी व संबंधितास पावती देण्यात यावी.

८. सदर योजनेंतर्गत कार्यरत कर्मचा-यास काही कारणास्तव पदावरून दूर करावयाचे झाल्यास यासाठी संबंधित ईम्प्लीमेंटींग एजन्सीने जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या व्यवस्थापन समितीची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील.

९. ईम्प्लीमेंटींग एजन्सीव्दारे वन स्टॉप सेंटर या योजनंतर्गत नेमलेल्या कर्मचा-यांना देण्यात येणारे मासिक मानधन संबंधित कर्मचा-यांच्या बँक खात्यात दरमहा ,शासनाने निश्चीत केलेल्या दरानुसार अदा करणे आवश्यक राहील.सदरील मानधन संबंधित कर्मचा-यास मिळते किंवा नाही याबाबत जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या व्यवस्थापन समितीने वेळोवेळी खात्री करणे आवश्यक राहील.

१०.सदर योजनेच्या जिल्हास्तरीय सनियंत्रणाची जबाबदारी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांची राहील.

११.केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व वन स्टॉप सेंटर कार्यान्वित आहेत याची वेळोवेळी खातरजमा कऱण्याची जबाबदारी जिल्हा महिला व बालविकास अधिकारी यांची राहील

१२.योजनेंतर्गत एखादे वेळी अपरिहार्य कारणास्तव एजन्सीला विहित कालावधीत अर्थसहाय्य प्राप्त न झाल्यास सर्व कर्मचा-यांना दरमहा वेतन अदा कऱण्याची जबाबदारी संबंधीत एजन्सीची राहील.यानुषंगाने योजनेची अंमलबजावणी करणारी संस्था आर्थिकदृष्ट्या सक्षम आहे याची खातरजमा जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठित व्यवस्थापन समितीने करावी.

१३.ईम्प्लीमेंटींग एजन्सीकडुन सेवा शुल्क, TDS इ. शासकीय कर भरण्यात येत असलेबाबत जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठित व्यवस्थापन समितीने सनियंत्रण करावे. तसेच कोणत्याही एजन्सीला एका वेळी तीन वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी नियुक्ती देण्यात येऊ नये.

१४.ईम्प्लीमेंटींग एजन्सी व कर्मचारी यांच्यामध्ये करण्यात येणा-या करारपत्राचा (Contract) मसुदा आयुक्त, महिला व बालविकास पुणे यांनी तयार करावा व सर्व जिल्हाधिकारी (सर्व) तथा अध्यक्ष, व्यवस्थापन समिती यांना उपलब्ध करून देण्यात यावा.

१५.आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी सदर योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने वर्षातून दोनदा आढावा घेणे बंधनकारक राहील.

१६.केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना व वरील सूचनांचे अनुपालन करण्यास कसूर करणा-या संस्थेची मान्यता विहित कार्यपध्दतीन्वये रद्द करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९११०७१६५०४२९८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2019.11.07 16:52:52 +05'30'

( स्मिता निवतकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. मा.मंत्री, नियोजन / वित्त विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
७. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.

९. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सर्व जिल्हाधिकारी
११.सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग.
१२.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
१३.निवड नस्ती/का-२